


# प्राण्यांची शाळा

लेखन : जॉर्ज एच. हॅवर्स,  चित्र:  जॉयसी

# प्राण्यांची शाळा

मराठी : अर्चना कुलकर्णी





खूप खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. एकदा सगळ्या प्राण्यांनी नवीन जगाच्या बरोबर चालण्यासाठी काहीतरी शौर्यतेच काम करायचं ठरवल.



त्यासाठी त्यांनी शाळेची स्थापना केली.




त्यातील अभ्यासक्रमात पोहणे, चढणे, धावणे,
उडणे ह्याचा समावेश केला.




अभ्यासक्रम सोपा जावा म्हणून सगळ्या
प्राण्यांनी सर्व विषय घेतले.



बदक पोहण्यात एकदम तरबेज होते
अगदी त्याच्या शिक्षकांपेक्षा पण.



ते उडण्यात आणि धावण्यात एकदम कमजोर होते. त्या दोन्ही विषयात ते जेमतेम पास झालं.




ते धावण्यात हळु असल्यामुळे, त्याला शाळे नंतर थांबावं लागत होतं, धावण्याच्या सरावामुळे कितीतरी वेळा बदकाला पोहायला सुध्दा जायला मिळायच नाही.



त्याचा हा सर्व सराव त्याचे पाय थके पर्यंत चालला इतका कि शाळेत तो सर्वसाधारण पोहणारा ठरला. शाळेत सर्वसाधारण असणं चालत होतं. स्वतः बदक सोडलं तर कोणालाच ह्या गोष्टीची फारशी काळजी वाटली नाही.




ससा धावण्यात वर्गातून पहिला यायचा पण...



पोहण्याचा सराव करताना मात्र मानसिक संतुलन बिघडल सशाच.




खारुताई चढण्यामध्ये एकदम तरबेज होती पण उडण्याच्या वर्गात सराव करताना एकदम वैतागली. त्यातुन तिच्या शिक्षकांनी तिला झाडाच्या शेंड्यावरून न सांगता बुंध्या पासून उडायला सांगितले.



त्याचा परिणाम तिच्या हाता पायात गोळे आले आणि परीक्षेत चढण्यात C आणि उडण्यात D  क्रमांक मिळाला.




गरुड हा मस्तीखोर मुलगा होता, त्याला फारच शिस्त लावायला लागली.




चढण्यामध्ये त्याने वर्गातल्या सगळ्यांना हरवलं पण झाडाच्या शेंड्या पर्यंत त्याला हट्टाने त्याच्या पद्धतीने जायचं होतं.




वर्षाच्या शेवटी बाम नावाचा मासा वर्गात पहिला आला कारण तो पोहण्यात तरबेज होताच पण चढण्यात, धावण्यात, उडण्यात सुद्धा तो बऱ्यापैकी हुशार होता.




त्याचा आदरपूर्वक समारोप देण्यात आला.




उंदिर घुशी हे प्राणी मात्र शाळेच्या बाहेरच होते कारण बीळ करणे खोदणे हे विषय त्यांच्या अभ्यासक्रमात नव्हते.




ससा आणि घुशी सारख्या प्राण्याच्या कडे त्यांनी आपल्या मुलांना पाठवुन शिक्षित करून त्यांच्या मदतीने खाजगी शाळा उघडली.



ह्या छोट्याशा प्राण्यांच्या गोष्टी

वरून काही बोध मिळतो का?



एक शिक्षक म्हणून आमची पूर्ण कारकीर्द ह्याच होकारार्थी विचारात असते की प्रत्येक विद्यार्थी हा गुणांनी आणि चारांनी वेगळा असतो आणि क्षमतेने सुद्धा त्यांचं अनिवार्य मुल्यांकन, त्याची ध्येयाकडे जाण्याची क्षमता, त्याच सर्वमान्य ज्ञान ह्यावरून त्याची विद्वत्ता कळते.

आम्ही कागदपत्रे देतो, वाचन घेतो, सभा घेतो, समाजात वावरायला शिकवतो. पण कुठपर्यंत? हे निर्विवाद सत्य समोर येऊन सुद्धा अनेक जिल्ह्यात तोच अभ्यासक्रम शिक्षकचालूच ठेवतात, प्रत्येक विध्यार्थ्याची क्षमता लक्षात न घेता. तीच गोष्ट विध्यार्थ्यांची पण नशिबाने हवर्ड गार्डनर्स युनिव्हर्सिटीच्या बुद्धिमत्तेची क्षमता संशोधनाने आता कसं शिकवावं ह्याचे दरवाजे उघडले आहेत जॉर्ज एच. हॅवर्स ह्यांचा विश्वास तसंच आपल्या सारख्या हजारो शभरातल्या शिक्षकांचा विश्वास आणि मत असं कि शिक्षणाच्या दुविधेचा उपाय शोधून काढलाच पाहिजे.



आमचा विश्वास आहे की लोकांच्या पैशाचा उपयोग मुलांच्या शाळा अद्ययावत,योग्य आणि वेगळ्या केल्या पाहिजेत. जर आपण मुलांची आवड जोपासून अभ्यासक्रम घेतला नाही आणि प्रत्येक विद्यार्थी हा स्वतंत्र अभ्यासक आहे जे जर कृतीत आणलं नाही तर आपला समाज पुढे जाणार नाही.

लक्षात ठेवा - अनेक मुलांना एकत्र शिकवू शकू असा एकही अभ्यासक्रम नाही परंतु प्रत्येक विद्यार्थ्यांला त्याची आवड लक्षात घेऊन स्वतंत्र शिकवू शकु  हे नक्कीच शक्य आहे. एखाद्या निर्णय घेण्याची ताकद असणाऱ्याला हि माहिती नक्कीच द्या आणि हे पुस्तक त्याच्या पर्यंत पोचवा.

